**ई-फेरफार व ई-चावडी प्रकल्प राबविण्याकरिता अमरावती व रायगड जिल्ह्यातील ग्राम महसूल अधिकारी (तलाठी) व मंडळ अधिकारी यांना डेटा कार्ड वापरासाठी वाढीव निधी देणे.**

## महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : राभूअ-२०२३/प्र.क्र.१९०/ल-१**

पहिला मजला, मुख्य इमारत, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २८ मार्च २०२५.

वाचा :-

१. महसुल व वन विभाग, शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०२३/प्र.क्र.१९०/ल-१, दि.२२/०३/२०२४.
२. जमाबंदी आयुक्त व संचालक भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. रा.भू.-१/डाटा कार्ड/२०२४, दि.३०/०५/२०२४.
३. महसुल व वन विभाग, शासन निर्णय क्र. आस्था-२०२३/प्र.क्र.१९०/ल-१, दि.०४/१०/२०२४.
४. जमाबंदी आयुक्त व संचालक भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. रा.भू.-१/डाटा कार्ड/२०२४, दि.०२/०१/२०२५.

**शासन निर्णय :-**

ई महाभूमि अंतर्गत ई-फेरफार व ई-चावडी या अज्ञावलीच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी राज्यातील ग्राम महसूल अधिकारी (तलाठी) व मंडळ अधिकारी यांना डेटा कार्ड वापरासाठी शुल्काची प्रतीपूर्ती अनुज्ञेय करण्यात आली आहे. त्यानुषंगाने दि. १२.०३.२०२४ रोजी झालेल्या प्रकल्प अंमलबजावणी समीतीच्या (PIC) बैठकीमध्ये डेटा कार्ड वापराच्या शुल्काच्या सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाच्या प्रतीपूर्तीसाठी मागणी क्र.सी.१, २०२९०४२२ (१७) संगणक खर्च (योजनेत्तर) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध निधीमधून आणि जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या स्वीय प्रपंजी लेखा (PLA) खात्यामधून खर्च करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार संदर्भ क्र. १ येथे नमूद शासन निर्णयाव्दारे अमरावती व रायगड जिल्ह्यासाठी मंजूर केलेल्या निधी व्यतिरिक्त सदर दोन्ही जिल्ह्यांसाठी वाढीव निधी उपलब्ध करून देण्याबाबत संदर्भ क्र. २ येथे नमूद पत्राव्दारे जमाबंदी आयुक्त व संचालक भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी प्रस्ताव सादर केला होता.

जमाबंदी आयुक्त व संचालक भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या प्रस्तावास अनुसरून संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयाव्दारे अमरावती व रायगड जिल्ह्यासाठी अनुक्रमे रू.८,७६,३७५/- व

रू.२५,२७,२००/- इतका वाढीव निधी मंजूर करण्यात आला आहे. तथापि, जमाबंदी आयुक्त व संचालक भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भ क्र. ४ येथील पत्राव्दारे सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरून संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयात खालीलप्रमाणे परिच्छेद क्र. ४ नंतर अतिरिक्त परिच्छेद समाविष्ट करण्यात येत आहे.

"म.को.नि. ३१ वर देयके सादर करण्यास देयकासोबत उपप्रमाणकाऐवजी जिल्हाधिकारी अमरावती व रायगड यांच्या मूळ मागणी पत्रकावर "Pass for Payment" करून देयक कोषागारामध्ये सादर करण्यास याव्दारे विशेष बाब म्हणून मंजुरी देण्यात येत आहे."

२. सदर मंजूरी केवळ या प्रकरणाबाबत लागू असून संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयातील इतर अटी कायम असतील.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाने अनौ. संदर्भ क्र. ७८/२०२५/को.प्र.-५, दि.०३/०३/२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२८१४५१५२१११९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY RAGHUNATH BANKAR

Digitally signed by SANJAY RAGHUNATH BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY RAGHUNATH BANKAR
Date: 2025.03.28 14:53:48 +05'30'

**( संजय बनकर )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:-**

१. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. विभागीय आयुक्त, कोकण/अमरावती.
३. प्रधान महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा) महाराष्ट्र, नागपूर.
५. जिल्हाधिकारी, अमरावती/रायगड .
६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती/रायगड.
९. वित्त विभाग (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई.
१०. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन अधिकारी (ब-१/ई-६), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती/ल-१.